सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाची रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कॅशप्लो-२०१६/प्र.क्र.१०२(अ)/गृनिभू**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०१७.

**शासन निर्णय :-**

मागणी क्र.क्यु-१ मुख्यलेखाशिर्ष २०४९- व्याजप्रदाने, ०३ - अल्पबचत भविष्य निर्वाह निधी इत्यादीवरील व्याज, १०४ राज्य भविष्य निर्वाह निधीवरील व्याज, इतर संकीर्ण भविष्य निर्वाह निधी (००) (०१) महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज (२०४९ ०८४२) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता रु.१९,४५,२७,०००/- (रुपये एकोणीस कोटी पंचेचाळीस लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. वित्तीय वर्ष २०१६-२०१७ करीता खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेली सदर रक्कम पुस्तकी समायोजनाने म्हाडास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांनी उपलब्ध प्राप्त तरतूदीमधून अत्यंत आवश्यक व अनिवार्य खर्च करावा. तसेच मंजूर अनुदानापेक्षा सदर खर्च जास्त होणार नाही याची खबरदारी घ्यावी.

३. या बाबीवर होणारा खर्च वरील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून, तो २०१६-१७ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२३१५०७४२७८०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

M.U.Bharose

Digitally signed by M.U.Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3abf3ab8b16dfec487f18ce64d6b0ab8e38d8925d44d15f7dbd61babb4ae6df, cn=M.U.Bharose
Date: 2017.03.23 15:12:44 +05'30'

**( मुं.उ.भरोसे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०००५१.

२) महालेखाकार-१/२ (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१
७) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
८) निवडनस्ती/ गृनिभू कार्यासन.